**संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती येथील भौतिकशास्त्र विभागाच्या इमारतीच्या बांधकामाच्या खर्चास मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्रशिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः एएमयु - २००९/(१५७/०९)/विशि-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ फेब्रुवारी, २०१०.

**पहा** :- १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. एएमयु- २००८/(१३८/०८)/ विशि-२, दि. ६ नोव्हेंबर, २००८
२) शासन निर्णय क्र. एएमयु-२००९/(९०/०९)/विशि-अर्थ, दि. ३१.३.२००९
३) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण क्र. युएनआय/२००८-२००९/यो.योजना/अवि/विशि-१,८०७, दि. १५.५.२००९

**पार्श्वभूमी** : संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठाच्या भौतिकशास्त्र विभागाच्या इमारत बांधकामाच्या दुस-या टप्प्याच्या बांधकामासाठी रुपये ५,८४,०७,९००/- (रुपये पाच कोटी चौ-यांऐंशी लक्ष सात हजार नऊशे फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय खर्चास व आराखडयाच्या प्रस्तावास संदर्भिय क्र. १ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर बांधकामाकरिता सन २००८-०९ या आर्थिक वर्षामध्ये रुपये ५७,४०,१५०/- (रुपये सत्तावन्न लक्ष चाळीस हजार एकशे पन्नास फक्त) इतक्या रक्कमेस संदर्भिय क्र. २ च्या शासन निर्णयान्वये एवढी आर्थिक तरतूद मंजूर करण्यात आलेली आहे.

**शासन निर्णय** :- सन २००९-१० या आर्थिक वर्षामध्ये संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठाच्या विकास कामासाठी रुपये २५,००,०००/- (रुपये पंचवीस लाख फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. सदर निधी विद्यापीठास भौतिकशास्त्र विभागाच्या इमारत बांधकामासाठी वितरीत करण्याचे संचालक उच्च शिक्षण यांनी संदर्भिय क्र. ३ येथील पत्रान्वये प्रस्तावित केले आहे. त्यानुसार सदर रुपये २५,००,०००/- (रुपये पंचवीस लाख फक्त) एवढा निधी सदर कामासाठी वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल -२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोजन प्रमाणपत्र (Utilisation Certificate)संबंधितांना योग्य वेळी सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. विद्यापीठाच्या भौतिकशास्त्र विभागाचे बांधकामाची प्रगती अवगत करावी. सदर खर्च " मागणी क्रमांक - डब्ल्यु-२ प्रधानशिर्ष २२०२,सर्वसाधारण शिक्षण ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण १०२, विद्यापीठांना

सहाय्य, - (००) (१२) अमरावती विद्यापीठाचा विकास (२२०२ ३४७७), ३१ सहाय्यक अनुदाने " या लेखाशिर्षाखाली तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि. १५ मे, २००९ मधील भाग पहिला उप विभाग तीन मधील अ.क्र. ४ नियम क्रमांक २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१००२२६१५०८४३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( रा. गो. जाधव )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई,
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३) कुलगुरु, संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती.
४) कुलसचिव, संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती.
५) सहसंचालक ( उच्च शिक्षण) अमरावती विभाग, अमरावती.
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
७) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
९) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
१०) वित्त विभाग,(व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
११) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) मा. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१३) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१४) अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५) निवड नस्ती (विशि-२)